तालुका क्रीडा संकुल-बारामती, जि.पुणे, तालुका क्रीडा संकुल- सिन्नर, जि.नाशिक, तालुका क्रीडा संकुल- सय्यदप्रिंप्री, जि.नाशिक ही तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर यासाठी मंजूर झालेल्या निधीचे वितरणाबाबत- लेखाशिर्ष (२२०४-१७९२)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ताक्रीसं-१५२१/ प्र.क्र. २७१/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२२

वाचा:- १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.राक्रीधो-२००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दिनांक २३ मार्च, २००३.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.राक्रीधो-२००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.

३) वित्त विभाग, शासन पत्र क्र.पुरक २९२१/(७१/२१)/अर्थसंकल्प, दिनांक ४ जानेवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

तालुका क्रीडा संकुल-बारामती, जि.पुणे, तालुका क्रीडा संकुल- सिन्नर, जि.नाशिक, तालुका क्रीडा संकुल- सय्यदप्रिंप्री, जि.नाशिक ही तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर या संकुलांसाठी संदर्भ क्र.३ अन्वये लेखाशिर्ष २२०४-१७९२, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली डिसेंबर २०२१ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.१०००.०० लक्ष इतका निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे.

लेखाशिर्ष २२०४-१७९२ अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली अर्थसंकल्पीत रु.६०००.०० लक्ष तरतूद व पूरवणी मागणीद्वारे मंजूर रु.१०००.०० लक्ष तरतूद अशी एकूण रु.७०००.०० लक्ष तरतूद उपलब्ध आहे. डिसेंबर,२०२१ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पूरवणी मागणीद्वारे सदर तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर साठी एकत्रित मंजूर झालेल्या रु.१०००.०० निधीमधून, वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १४.१०.२०२१ मधील निर्देशांनुसार ६० टक्के म्हणजे रु.६००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. वितरणासाठी उपलब्ध सदर रु.६००.०० लक्ष निधी उपरोक्त तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर यासाठी वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

तालुका क्रीडा संकुल-बारामती, जि.पुणे, तालुका क्रीडा संकुल- सिन्नर, जि.नाशिक, तालुका क्रीडा संकुल- सय्यदप्रिंप्री, जि.नाशिक ही तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर यासाठी लेखाशिर्ष २२०४-१७९२ अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली डिसेंबर २०२१ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या रु.१०००.०० लक्ष निधीच्या ६० टक्के म्हणजे रु.६००.०० लक्ष निधी उपरोक्त तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर यांना वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. वितरणासाठी उपलब्ध रु.६००.०० लक्ष निधीचे प्रत्येकी रु.१५०.०० लक्ष याप्रमाणे समप्रमाणात वाटप करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. याअनुषंगाने लेखाशिर्ष २२०४-१७९२ अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टांखाली खाली तीन क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी, जि.नागपूर यांना खालील अटी/शर्तीच्या अधिन राहून, पुढील तक्यात नमूद केल्यानुसार निधी वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | क्रीडा संकुलाचे नाव | लेखाशिर्ष | वितरणासाठी मंजूर निधी (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | तालुका क्रीडा संकुल, ता.बारामती, जि.पुणे | २२०४-१७९२ | १५०.०० |
| २ | तालुका क्रीडा संकुल, ता.सिन्नर, जि.नाशिक | २२०४-१७९२ | १५०.०० |
| ३ | तालुका क्रीडा संकुल, ता.सय्यदप्रिंप्री, जि.नाशिक | २२०४-१७९२ | १५०.०० |
| ४ | फुटबॉल स्टेडियम, ता.कामठी,जि.नागपूर | २२०४-१७९२ | १५०.०० |
| | **एकूण- रुपये** | | **६००.००** |
| **(अक्षरी रु. सहाशे लाख फक्त)** | | | |

**अटी/शर्ती:-**

१) उपरोक्त तक्यातील तीन तालुका क्रीडा संकुले व फुटबॉल स्टेडियम, कामठी यांना मंजूर झालेला निधी बांधकामाच्या प्रगती अहवालानुसार संकुल समित्यांना वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२) सदर क्रीडा संकुलांच्या सुधारीत अंदाजपत्रक व आराखडयांना राज्य क्रीडा विकास समितीची कार्योत्तर मान्यता घेण्यात यावी.

३) ज्या उद्देशासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याव्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच, निधी इतर लेखाशिर्षाकडे वळविता येणार नाही.

४) बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय मान्यता, तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे राज्य क्रीडा विकास समितीची मान्यता घेण्याची कार्यवाही करावी.

५) खर्च झालेल्या निधीचे विनियोग प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

२. उपरोक्त अटी व शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील, या अनुषंगाने काही वाद उद्भवल्यास शासनाचा निर्णय अंतिम राहील.

३. यावर होणारा खर्च, “मागणी क्रमांक ई-३, लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, योजनांतर्गत योजना, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची स्थापना, तालुका क्रीडा संकुल बांधकाम, ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)” संगणक क्र.२२०४-१७९२ या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. या साठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा, यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौ.संदर्भ क्र.२२/१४७१, दि.१९.०१.२०२२ व वित्त विभाग, अनौ.संदर्भ क्र.११५/२०२२/व्यय-५, दि.०२.०२.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१५०६५००९२१ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.11 11:22:47 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा.मुख्य मंत्री यांचे सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.मंत्री (क्रीडा व युवक सेवा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (क्रीडा व युवक सेवा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
११. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१२. उपसंचालक (क्रीडा) पुणे/नाशिक/नागपूर, (संचालनालयामार्फत)
१३. जिल्हा क्रीडा अधिकारी, पुणे/नाशिक/नागपूर, (संचालनालयामार्फत)
१४. जिल्हा कोषाधिकारी, पुणे/नाशिक/नागपूर, (संचालनालयामार्फत)
१५. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नाशिक/नागपूर, (संचालनालयामार्फत)

१६. तालुका क्रीडा अधिकारी, बारामती/सिन्नर/सय्यद प्रिंप्री/कामठी, (संचालनालयामार्फत)
१७. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१८. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (क्रीयुसे-१).